**विकास योजना - नागपूर**

मौजे हंसापूरी येथील खसरा क्र. ३३, नगर भूमापन क्र. १४०१, गुरुनानकपुरा येथील जुनी रमाबाई आंबेडकर प्राथमिक शाळेच्या जागेवरील कम्युनिटी सेंटर वगळून "उद्यान" म्हणून आरक्षित करणेबाबत, महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ चे कलम ३७(२) अन्वये अधिसूचना....

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई : ४०० ०३२**
**शासन निर्णय क्र.टिपीएस-२४०८/९७६/प्र.क्र.३६२/०९/नवि-९,**
**दिनांक : ०७ एप्रिल, २०१०.**

**शासन निर्णय** :- सोबतची अधिसूचना (मराठी / इंग्रजी) महाराष्ट्र शासनाचे राजपत्रात कृपया प्रसिध्द करावी.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

**( प्रदीप गोहिल )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
२) जिल्हाधिकारी, नागपूर.
३) आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर.
४) सभापती, नागपुर सुधार प्रन्यास, नागपूर.
५) संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) उप सचिव (नगररचना), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
७) उपसंचालक नगररचना, नागपूर विभाग, नागपूर.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, प्रस्तुत प्रकरणी शासनाने अधिप्रमाणित करावयाच्या भाग नकाशाच्या तीन प्रती शासनास त्वरीत सादर कराव्यात.)
८) सहायक संचालक नगर रचना, नागपूर शाखा, नागपूर.
९) व्यवस्थापक, शासकीय मुद्रणालय, नागपूर.
(त्यांना विनंती करण्यात येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाचे राजपत्रात नागपूर विभागीय पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करण्यात येऊन त्यांच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास, उपसंचालक, नगर रचना, नागपूर विभाग नागपूर व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना पाठविण्यात याव्यात.)
१०) कक्ष अधिकारी, कार्यासन नवि-२९, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची अधिसूचना विभागाच्या वेब साईटवर ठेवावी.
११) निवडनस्ती (कार्यासन नवि ९).

**अधिसूचना**
**नगर विकास विभाग**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक: ०७ एप्रिल, २०१०.**

*महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगर रचना अधिनियम, १९६६*

**क्रमांक : टीपीएस-२४०८/९७६/प्र.क्र.३६२/०९/नवि-९:** ज्याअर्थी, नागपूर शहराची सुधारित विकास योजना शासन अधिसूचना, नगर विकास विभाग क्र. टीपीएस २४९६/२६४३/प्र.क्र. ३००(अ)/९७/नवि-९, दिनांक ७ जानेवारी, २००० अन्वये मंजूर झाली असून ती दिनांक १ मार्च, २००० पासून अंमलात आली आहे. (यापुढे "उक्त विकास योजना" असे संबोधिले आहे);

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेत मौजे हंसापूरी येथील खसरा क्र. ३३, नगर भूमापन क्र. १४०१, गुरुनानकपुरा येथील जुनी रमाबाई आंबेडकर प्राथमिक शाळेच्या २०३५.९२ चौ.मी. जागेवर (यापुढे "उक्त क्षेत्र" असे संबोधिले आहे) "कम्युनिटी सेंटर" दर्शविले आहे ;

आणि ज्याअर्थी, नागपूर महानगरपालिकेने (यापुढे "उक्त महानगरपालिका" असे संबोधिले आहे) उक्त क्षेत्र कम्युनिटी सेंटर मधून वगळून "उद्यान" म्हणून आरक्षित करण्याचा फेरबदल प्रस्ताव (यापुढे "उक्त फेरबदल प्रस्ताव" असे संबोधिले आहे) महाराष्ट्र प्रादेशिक नियोजन व नगररचना अधिनियम, १९६६ (१९६६ चा महाराष्ट्र अधिनियम क्र. ३७ चा) (यापुढे "उक्त अधिनियम" असे संबोधिले आहे) चे कलम ३७ (१) अन्वये विहित वैधानिक कार्यवाही पूर्ण करुन शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला आहे ;

आणि ज्याअर्थी, आवश्यक त्या चौकशीनंतर व संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर उक्त फेरबदल प्रस्ताव आवश्यक असल्याचे व मंजूर करणेबाबत शासनाचे मत झाले आहे ;

आता, त्याअर्थी, उक्त अधिनियमाचे कलम ३७ चे पोटकलम (२) अन्वये असलेल्या अधिकारांचा वापर करुन उक्त विकास योजनेतील उक्त फेरबदलास मंजूरी देण्यात येत आहे आणि त्यासाठी उक्त विकास योजना मंजूरीची उपरोल्लिखित दिनांक ७ जानेवारी, २००० ची अधिसूचना सुधारित करण्यात येत आहे ;

विकास योजना मंजूरीच्या अधिसूचनेच्या फेरबदल सूचीतील शेवटच्या नोंदीनंतर पुढील नव्या नोंदीचा समावेश करण्यात येत आहे-

<u>नोंद</u>

"मौजे हंसापूरी येथील खसरा क्र. ३३, नगर भूमापन क्र. १४०१, गुरुनानकपुरा येथील जुनी रमाबाई आंबेडकर प्राथमिक शाळेच्या जागेवरील २०३५.९२ चौ.मी. जागेवरील कम्युनिटी सेंटर, नकाशात दर्शविल्यानुसार वगळून "उद्यानाचे" नविन आरक्षण म्हणून आरक्षित करण्यात येत आहे."

टिप:- १) उपरोक्त फेरबदल दर्शविणा-या भाग नकाशाची प्रत आयुक्त, नागपूर महानगरपालिका, नागपूर यांच्या कार्यालयात कार्यालयीन वेळेमध्ये नागरिकांच्या अवलोकनार्थ एक महिन्याच्या कालावधीसाठी ठेवण्यात आली आहे.

२) सदर अधिसूचना विभागाच्या w.w.w.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर देखील उपलब्ध आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,**

( प्रदीप गोहिल )
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

37/21 Nagpur MSW-65

NOTIFICATION

**Government of Maharashtra**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai-400 032.**
**Dated:- 07th April, 2010**

The Maharashtra Regional & Town Planning Act, 1966.

**No. TPS-2408/976/CR-362/09/UD-9:** Whereas, the Revised Development Plan of Nagpur has been sanctioned by the Government vide Urban Development Department's Notification No. TPS2496/2643/CR-300(A)/97/UD-9, dated the 7th January of 2000 and has come into force with effect from the 1st March of 2000 (hereinafter referred to as 'the said Development Plan');

And whereas, the land bearing Khasara Nos. 33, City Survey No. 1401 of Mouje Hansapuri, Guru Nanakpura admeasuring 2035.12 sq.mt. of Old Ramabai Ambedkar Priamary School (hereinafter referred to as "the said Land") is shown as 'Community Centre' ;

And whereas, the Nagpur Municipal Corporation (hereinafter referred to as the "said Municipal Corporation") has submitted the modification proposal to delete said Land from Community Centre and to reserve the land so released as "Park' (hereinafter referred to as 'the said Modification Proposal") after following all the legal procedure stipulated under section 37 (1) of the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 (Maharashtra Act No. XXXVII of 1966) (hedreinafter referred to as the "said Act") ;

And whereas, after making necessary enquiries and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune Government is of the opinion that the said Modification Proposal is necessary and should be sanctioned ;

Now therefore, in exercise of the powers conferred under sub section (2) of the section 37 of the said Act, Government hereby sanctions the said Modification Proposal and for that purpose amends the above referred Notification dated 7th January, 2000 as follow :

In the Schedule of Modification appended in the Notification sanctioning the said Development Plan, following new entry shall be added after last entry-

**ENTRY**

"The land admeasuring about 2035.12 sq.mt. bearing Khasara Nos. 33, City Survey No. 1401 of Mouje Hansapuri, Guru Nanakpura is deleted from Community Center and land so released is reserved as "Park' as shown on the plan'.

**Note:**-1) A copy of the part plan of aforesaid sanctioned modification is available for public inspection in the office of the Commissior, Nagpur Municipal Corporation, Nagpur during office hours on all working days for one month.

2) This Notification is also available on department's web site www.urban.maharashtra.gov.in

**By order and in the name of the Governor of Maharashtra,**

**( Pradeep Gohil )**
**Section Officer to Government.**